**राज्य क्षेत्रातील योजना**

पानोडी व ९ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. संगमनेर जि. अहमदनगर या योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास पुनर्सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र, ग्रापापु-२०१०/प्र.क्र.७७/पापु-०९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २० नोव्हेंबर २०१०.

संदर्भ:- १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ववेका/१०९८/सीआर/४४५/पापु-१०,दि.२६.११.१९९८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रापापु १८०३/प्र.क्र.१२२/पा.पु.०९ दि. २ ऑगस्ट २००३
३. शासन पत्र क्र. बैठक २०१०/ प्र.क्र.५७/पा.पु.०९ दि. २५ जून २०१०

**प्रस्तावना:-**

पानोडी व ९ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. संगमनेर जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु. १५०३.३१ लाख ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भीय शासन निर्णय क्र. १ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर सदर योजनेच्या रु.२२८६.५७ लक्ष ढोबळ रकमेस संदर्भीय शासन निर्णय क्र. २ अन्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. २१७.६९ लाखाने वाढ झाली. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे अध्यक्षतेखाली दि. १६ जून २०१०रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार पानोडी व ९ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना, ता. संगमनेर जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेस पुनर्सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वरील बाब विचारात घेऊन पानोडी व ९ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या रु.२१७.६९ लाख (रुपये दोन कोटी सतरा लाख एकोणसत्तर हजार फक्त) या वाढीव खर्चासह सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्यानुसार रु. २५०४.२६ लाख (रुपये पंचवीस कोटी चार लाख सव्वीस हजार फक्त) इतक्या पुनर्सुधारित किमतीस प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.

३ सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४.	सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करण्याच्या निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नयेत.

५.	सदर योजनेची उर्वरीत कामे तात्काळ पूर्ण करण्यात यावीत.

६.	या योजनेवर होणारा सुधारित किंमतीपर्यंतचा म्हणजेच रु. २२८६.५७ लक्ष मधील रु. १२७८.८१ लक्ष इतका खर्च केंद्र शासनाच्या वर्धीत वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा. उर्वरीत रु.१००७.७६ लक्ष हा खर्च किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागवावा. पुनर्सुधारित किंमतीमधील वाढीव खर्च रु. २१७.६९ लक्ष महाजल खाली उपलब्ध होणाऱ्या निधीमधून राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचे कडून उपलब्ध करुन घ्यावा.

७.	हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. २५६/१४७३ दि. २७/९/२०१० व ४५७/व्यय-३ दि.२५/१०/२०१० अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक२०१०११२०१६४३३२००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सोबत-प्रपत्र.

**(ज.र. गणेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक.
जिल्हाधिकारी, नाशिक
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.
वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/ मुंबई .
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (संकल्पचित्र व नियोजन विभाग,)सिडको भवन, नवी मुंबई.
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, संगमनेर
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा व परिक्षा अधिकारी, मुंबई.

सर्व विधानमंडळ सदस्य,
वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१९, २० व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
निवडनस्ती कार्यासन पापु-०९.

**सहपत्र**

**शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु- २०१०/प्र.क्र.७७/ पापु-०९ दिनांक:-२० नोव्हेंबर २०१० सोबतचे प्रपत्र.**

**(रुपये लाखात)**

| **योजनेचे नांव** | **तालुका/ जिल्हा** | **योजनेची सुधारीत मंजूर किंमत** | **योजनेचा सुधारित मंजूरी आदेश क्र व दिनांक** | **योजनेची पुनर्सुधारीत मंजूर किंमत** | **महाजल योजनेअंतर्गत (राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचेकडून) उपलब्ध तरतूद** | **वाढीव किंमत** |
|---|---|---|---|---|---|---|
| पानोडी व ९ गांवे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना | संगमनेर/ अहमदनगर | अ)वर्धित वेग कार्यक्रम १२७८.८१ ब)किमान गरजा कार्यक्रम १००७.७६ | अ)वर्धित वेग कार्यक्रम २६४.२४ ब)किमान गरजा कार्यक्रम १४८.४१ | अ)वर्धित वेग कार्यक्रम १२७८.८१ ब)किमान गरजा कार्यक्रम १२२५.४५ | २१७.६९ | **२१७.६९** |
| **एकुण** | | **२२८६.५७** | | **२५०४.२६** | | |

(ज.र.गणेकर)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन